# बस

**-- चं.प्र.देशपांडे.**

( बसची बाकं आणि एक घंटी. बाकं अर्थात प्रेक्षकोन्मुख. अगदी डाव्या बाजूच्या बाकावर कंटक्टर बसलेला. त्याचा पोशाख वगैरे अर्थात कंटक्टरसारखा. बसच्या खिडक्या, अमूक, तमूक भाग दाखवण्याची जरूर नाही.)

कंटक्टर: ( प्रेक्षकांना उद्देशून ) लोक हो, नमस्कार ! आता इतर उपचार - म्हणजे घरगुती चौकशा, इकडतिकडच्या चार गोष्टी -- वगैरे न पाळता थेट मुख्य भागाला सुरुवात करतो. आता तुम्हाला दिसतंच आहे की, इथं ही एक बस मांडलेली आहे. आणि मी कंटक्टरची वस्त्रं अंगावर घेतलेली आहेत. पेशवे काय, कंटक्टर काय -- सगळं एकच. ते असो. तर सांगायचा उद्देश असा की, ही जी काय बस इथं मांडलेली आहे, ती नाटकातली आहे. खरी नव्हे. म्हणजे तशी खरीच. पण नाटकातली खरी. थांबा. असे अस्वस्थ होऊ नका. मी काही तुमचा फार वेळ घेणार नाही. पुढची एकांकिका पाह्यला तुम्ही उत्सुक आहात, हे मलाही कळतंय. ही बस अन् एकांकिका, दोन्हीही मी एकदमच सुरू करणार आहे. तर ते माझ्याकडंच असल्यामुळं तुम्हाला थोडं थांबावंच लागेल. असो. आणि हे सगळं मी तुमच्यासाठी बोलतोय. तुम्ही डोक्याला नाहक ताप करून घेऊ नये, म्हणून बोलतोय. तर ही बस नाटकातली, राइट ? पाहिजे तर ही एकमेव अशी बस आहे, असं म्हणा. आता यातल्या ज्या ज्या गोष्टी समर्थनीय आहेत, त्यांचा प्रश्नच नाही. पण समजा, काही गोष्टी अशा असल्या, की त्यांचं समर्थन तुमच्या ध्यानात येत नाहीय, तर माझं ऐका, तुम्ही ते चक्क गृहीत धरा -- एक गुपित सांगून टाकायचं झालं तर ही एकांकिका बसवताना आम्ही तेच केलेलं आहे. कारण काय आहे की, एखाद्या गोष्टीच्या समर्थनापेक्षा, त्यातून जर काही उभं राहात असेल, तर ते अधिक महत्त्वाचं आहे. निदान इथं आपण तसं मानलं पाहिजे. राइट ? तर ही या बसची बाकं, किंवा ही सगळी त्या अर्थानं एकमेव अशी बाकं. आणि ही या बसची एवढीच बाकं आहेत, असं काही नाही. राइट ? आता तुम्ही म्हणाल,ही बस कुठं चाललीय ? तर त्याची दोन उत्तरं संभवतात-- " कुठंही '' आणि '' कुठंही नाही. " रस्ता काटणं, अमूक किलोमीटर्स वेग, वगैरे गोष्टी बाजूला ठेवा. कारण तशी ही कुठंही जाणार नाही. पण....आता उदाहरणार्थ, तुम्ही --तुम्ही म्हणजे तुम्ही, आम्ही, आपण -- जर स्थिर असलात, तरी तुमच्यातल्या असंख्य गोष्टी असंख्य दिशांनी जातच असतात की नाही ? म्हणजे विचार, भावना वगैरे वगैरे जी काही माणसाची वैशिष्ट्यं म्हणतात ती ? तर जात असतात. तसंच हे सगळं काही भयानक बंद असणं आणि तरीही सुरू असणं किंवा तसं वाटण्यासारखं असणं हे सर्व इथं तुमच्या समोर मांडण्यासाठी, ही बस अंतरात स्थिर आणि काळात चल आहे, असं गृहीत धरलेलं आहे. पाहिजे तर हे सगळं ढोबळ आहे, असं म्हटलंत तरी चालेल. आणि मी जरी तुमच्याशी बोलतोय असा आभास निर्माण केलेला असला, तरी लेखकानं लिहून ठेवलंय तेच मी बोलतोय. तेव्हा ते असो. राइट ? आणि दुसरं असं की, हे सगळं काही शिस्तबध्द आखलेलं नाही. म्हणजे असं की, हे सगळं सुरू झाल्यावर जे जसं उपलब्ध होईल ते तसंच असेल. म्हणजे असंबध्द असलं तरी त्याला माझा नाइलाज आहे. काही संबंध निर्माण झाले तरी त्यालाही माझा नाइलाज आहे. आता तुम्ही म्हणाल की, माझा म्हणजे कुणाचा ? व्यक्तिशः माझा, की मी काम करत असलेल्या कंडक्टरचा, की लेखकाचा ? -- तर तिघांचाही. राइट ? तर हे सगळं म्हणजे भयानक बंद असणं अन् तरीही चालू असणं -- किंवा तसं वाटणं. राइट ? आता तुम्ही म्हणाल की, ड्रायव्हर कुठं आहे ? तर इथं कुठंतरी मधे -- म्हणजे हे -- हे इथलं हे सगळं आणि तुम्ही या दोन्हींच्या मधे कुठंतरी तो आहे. तर मी त्याला आता बस सुरू करण्यास अनुज्ञा देतो -- किंवा आज्ञा देतो म्हणा हवं तर -- हा ज्याच्या त्याच्या वृत्तीचा प्रश्न आहे.( उठून दोरी ओढून टिंगटिंग अशी घंटी वाजवतो. एक साधारण तिशीतला गृहस्थ प्रवेशतो. मागच्याच भागात डाव्या बाजूच्या बाकावर खिडकीशी बसतो.)

तर आता ही ' बस ' एकांकिका सुरू झालेली आहे, असं मी जाहीर करतो. हा एक उतारू. या बसमधे अर्थात त्याला वेळाचं तिकीट काढावं लागेल. राइट ? म्हणजे उदाहरणार्थ, तुम्ही बाराला बसमधे चढलात तर बार--पंधराचं -- म्हणजे सव्वाबाराचं म्हणा हवं तर -- हा ज्याच्या त्याच्या वृत्तीचा प्रश्न आहे. असो. आता तुम्ही म्हणाल की, ही बस सुरू होणं किंवा थांबणं याला अर्थ काय ? तर मलाही अजून ते

नीटसं कळलेलं नाही. पण या बाबतीतलं माझं मत मी तुम्हाला योग्य वेळी सांगेन. तर ड्रायव्हर मधे कुठंतरी आहे हे नक्की. ते कृपया विसरू नका. तर ठीक. आता मी तुमच्याशी जरा या -- या उतारूबद्दल बोलतो. हां, दुसरं एक. आता हा एक इथं बसलेला आहे, त्या अर्थी बाकीची बस रिकामी आहे, असं समजू नका. जिथं कुणीतरी येऊन बसेल त्या जागा रिकाम्या होत्या असं समजा. एरवी या जागा रिकाम्या किंवा भरलेल्या आहेत, असं समजा. असो. मी थोडा वेळ असं म्हणून तुमचा फार वेळ घेतलेला दिसतो. सॉरी. तर वेळेचं महत्त्व आपण ओळखायला हवं. आता या वेळी आपण या विशिष्ट माणसाबद्दल बोलत आहोत. तर मी आता त्याच्याबद्दल बोलतो. तत्पूर्वी मला एकदा मिष्किल की कसं ते हसावं लागेल. (तसं हसून ) हां. आता ऐका. हा माणूस -- म्हणजे अनुभवानं आपलं एक माणसांची सायकॉलॉजी थोडी थोडी कळते असा आपला दावा आहे -- बघा तुम्ही -- हा माणूस आत चढला आणि हे पुढचं बाक रिकामं असताना -- लोकहो, हे मला गृहीत धरायचा अधिकार आहे -- तिथंच का बसला ? तर याला माझं उत्तर विचाराल तर असं आहे : हा माणूस एक तर बायकी मनोवृत्तीचा आहे किंवा बायकांची सायकॉलॉजी ओळखून असलेला एक पुरुष आहे. म्हणजे तसंच असेल असं नाही, पण एक साधारण अनुभवानं काही ढोबळ आराखडे -- किंवा तसे निष्कर्ष काढता येतात असं वाटतं. म्हणजे असं की, साधारणतः बायकांची अशी -- म्हणजे मनाची अशी ठेवण असते, की चढल्याचढल्या दिसेल त्या जवळात जवळच्या जागेवर स्थानापन्न व्हायचं. बस थोडी भरलेली असली आणि बाहेर क्यूमधे थोडे पुरुष अन थोड्या बायका असल्या, तर पुरुष भराभरा पुढच्या जागांकडे साधारणः जातात. समजा, पुढं बायका आहेत तर -- म्हणजे रांगेत म्हणतोय मी -- तर बसमधल्या पुढल्या बाकांवरही -- बहुतेक--पुरुषांच्या शेजारीच बसायचं वा मागंही तेच-- तर त्या मागंच बसतील. आणखी मला वेगवेगळ्या परिस्थित्या कल्पून, बायका मागच्या बाकावरच येण्याच्या शक्यता कशा अधिक, ते दाखवून देता येईल. तर हा माणूस असण्याच्या दोन शक्यता मी वर सांगितल्या त्याच-- म्हणजे त्याच्या मनोवृत्तीच्या. म्हणजे खात्रीनं असं मी म्हणणार नाही. तरीही शक्यता दाट. तो कसाही असला तरी अर्थात त्याला तिकीट काढावं लागेलच. तो प्रश्न वेगळा. तर मी त्याच्याकडे जातो. ( जाऊन टिकटिक वाजवतो.)

उतारू : बारा -- पंधरा.

कंटक्टर: तीन पैसे द्या. म्हणजे लोकहो, त्याचं असं आहे की, उतारू जो तास चालू असताना बसतो तो आकडा आणि मागितलेल्या वेळातली मिनिटं यांच्यात ज्या पध्दतीनं होईल तशी वजाबाकी करून जे येतं तेवढे पैसे तिकीट, असं ठरवून टाकलंय. कटकट नको. त्यामुळं अर्थात मतभेदाला जागा आहे. आता कसलंच काहीच नीट कळलेलं नाहीय, तर मतभेद होणारच. पण शेवटी कंडक्टरचं ऐकावं, अशी एक पध्दत आम्ही रुळवत आणलेली आहे. सोय आणि सोपेपणा. ड्रायव्हर मधल्या भागात कुठंतरी आहे, हे नक्की समजा. कारण, बस सुरू होणं -- थांबणं इत्यादी कंडक्टरचे हुकूम पाळले गेलेले आपल्याला स्पष्ट दिसू शकतात. पण वेळेसारखी सर्वात महत्त्वाची गोष्ट त्याच्या हातात आहे, हे आपल्याला नाकारता येणार नाही. पण त्याच्या कृतीत तसा लहरीपणा वगैरे, एका विशिष्ट अपवादाखेरीज, वा प्रमाणाबाहेर, मला दिसून आलेला नाही. पण तो इथं मधे कुठं तरी आहे मात्र खास.( उतारू तीन पैसे देतो. कंटक्टर त्याला भोकं पाडून तिकीट देतो.)ही भोकं मी पाडतो ती बहुतेकांच्या स्मृतिपटलांवर कायमची उमटतात. या भोकं पाडायच्या यंत्राचं नाव काळ. ही बस म्हणजे एक अनुभव असं म्हणावं का ? विचार करा. पण अंतरात स्थिर आणि वेळेत चल, असं हे काही तरी आहे. असंच मला माझ्या अनुभवावरून वाटतं. बघा, विचार करा. त्यामुळं हा घर्षणचा भाग. कशामुळं काय हे नक्की सांगायचा तसा अट्टाहास नाही, पण हे असं वाटतं. मतभेद झाले तर कदाचित आपण दोघेही सोय आणि सोपेपणा असू. किंवा एकंदर अजब आहे. अजून बरंच घडायचंय. जरा वेगानं जाऊ. राइट ? आणि दुसरं एक. कंडक्टरचं असं स्वरूप असलेली व्यक्ती मी आणि बस ही एकमेव, असं समजू नका. इतर अनेक व्यक्तींप्रमाणेच मीही अनेक आहे. तर वेग. अं ? कंटक्टरलाही कधी--कधी चार शब्द समजुतीनं आणि मोकळेपणानं बोलायची इच्छा होते, हे तसं तुमचं आमचं भाग्यच. निदान तसं समजायला हवं.( उतारूस ) काय हो, तुमचं शुभमंगल झालंय की नाही ?

उतारू : हो.

कंटक्टर: म्हणजे तुम्ही स्थिरस्थावरही असालच. निदान स्थानापन्न तरी आहातच. स्थावर जंगम इस्टेट असेल

नसेल, पण एकंदरीत सगळं हवं ते असूनही आणखी जवळ असावी हे तुमचं राहणारच -- म्हणजे इस्टेट, संपत्ती म्हणतोय मी.

उतारू : ( गडबडून ) नाही -- म्हणजे काय -- पण बरोबर आहे. वा ! खरंच करेक्ट. मजा हं. वा !
( हसतो. कंडक्टरही हसतो.) तुम्ही म्हणजे अगदी हे -- म्हणजे मानवी स्वभावाचं ज्ञान असलेले आहात. वा, छान !!

कंडक्टर : अहो कसचं काय न काय, ठीक आहे झालं. तर बारा पंधरा झालेले आहेत. आपण उतरू शकता.

उतारू : छे. अजून अडीच मिनिटं बाकी आहेत असं मला वाटतं.

कंडक्टर : कसली तरी वाट पाहताय त्याचा हा परिणाम. पण खरं म्हणजे पंधरा होऊन गेले आहेत.( एक बावीसएक वर्षांची तरुणी प्रवेशते. उतारूच्याच बाकावर मधे थोडी जागा सोडून बसते.)

उतारू : नाही म्हणजे, तसं जर असेल ना तर मला खरं म्हणजे याच्याही पुढंच जायचंय. बारा --( ती तरुणी काढत असलेल्या पैशांचा अंदाज घेत ) अंऽऽ--हं, बारा पन्नास द्या.

कंडक्टर : म्हणजे होतात अडतीस. तीन दिले. पस्तीस द्या.

उतारू : हं, हे पस्तीस ( कंडक्टर तिकीट देतो.)

कंटक्टर : लोकहो, काहीजणांना नावं असतात आणि काहींची नमुनेदार असतात. यांचं नाव मला वाटतं -- वेदना देव आहे. वेदना आणि देव यांची ही अशी सांगड माणूस ऊर्फ बाप वा आई यांच्याशिवाय कोण घालणार ? ईश्वराची लीला आगाध आहे ! ( टिकटिक टिकटिक. )

वेदना : बारा चाळीस.

कंडक्टर : अठ्ठावीस.
( पैसे देते. तिकीट देतो. अर्थात भोके पाडून. ) तर लोकहो, हे जे दहा मिनिटांचं अंतर राहाणार आहे ते याला भेडसावीत राहील. पण यांच्यातला चोरखेळ होणार नाही, असं होणं अशक्यच.( तो सुरु होतो.)
आता फक्त बघत राहा. ( एक साधारण बेताचीच दिसणारी बाई प्रवेशते. केस पांढरे होऊ घातलेले. त्यामुळे तसा फारसा प्रश्न नाही. ती येताच तिला जागा करून देण्यासाठी वेदना उतारूजवळ सरकते. बाई बसते. मागोमाग एक ग्रस्त चेहऱ्याचा तरुण प्रवेशतो. अगदी पुढे येऊन बाकावर मधल्या बाजूच्या कडेला बसतो.) या बाई म्हणजे सौ.सदाकाळ आणि हा तरुण -- अरुण घिर्टे. नाही म्हणजे नावं लक्षात ठेवा. माणसं ओळखणं त्यामुळं सोपं पडतं. आणखी बरीच येण्याची शक्यता आहे. किंवा इथंच असलेल्या काहींना आपण दृश्य स्वरूपात पाहण्याची शक्यता आहे. उगाच घोटाळा नको. राइट ? ( बाई कंडक्टरला वेळ सांगते. तो पैसे सांगतो. पैसे. तिकीट. तसंच अरुणच्या बाबतीत. नुसत्या हालचाली.)
आता तुम्ही म्हणाल की, त्या उतारूचं नाव का नाही सांगत, तर सगळ्या स--नाव्यात एक नि-नावी खपून जायला काय हरकत आहे ? म्हणजे उतारू हेच याचं नाव झालं. असो. लोकांना नावं ठेवायचा मला तसा पहिल्यापासूनचा कंटाळा आहे. पण नावांचा माणसांवर थोडाफार परिणाम होत असावा, अशी माझी अनुभवानं धारणा होऊ लागलेली आहे. म्हणजे अमूक एका माणसाचं नाव हे नसून दुसरं असतं, तर तो असाच असता असं वाटत नाही. त्याच माणसाला तेच लाईफ दोनदा वेगवेगळ्या नावांनी जगायला लावणं कठीण. त्यामुळं तसा पुरावा देता येणार नाही. शिवाय नावामुळं लाईफमधे पडणारे फरक पाहून, हा माणूस आता त्या नावामुळं वेगळा दिसतोय की वेगळ्या लाईफमुळं, असा प्रश्न उद्भवेल. गोंधळ आहे हो सगळा ! फार विचार केला की हे असं होतं. मी ॲक्शनमधे अडथळे आणतोय काय ? सॉरी. आता जरा वेग घेऊ.

अरुण : ए कंडक्टर, इकडं ये ना.

कंडक्टर : हॅलो माय दोस्त.

अरुण : मला भयंकर फ्रस्ट्रेशन आलंय. ( मागं चोरखेळ सुरू आहेच. वेदना आपली साथ नाही असं दाखवत दाखवत सामील होतेय. शेजारची बाई दुर्लक्ष आहे असं दाखवत लक्ष ठेवून.) असं वाटतंय की कुठल्याच बाबतीत आपल्याला जगाशी जमवून घेता येत नाहीय. सारखे खटके उडतायत. संघर्ष होतोय. एक मोकळेपणा,खेळीमेळी याला आपल्या आयुष्यात अजिबात स्थान नाही. आपण सतत एका प्रचंड दडपणाखाली आहोत आणि आपला सबंध जगाला एक प्रकारचा त्रासच होतोय.

कंडक्टर : असं ?

अरुण : आता नोकरी करून शिकतोय मी. परीक्षा दोन महिन्यांवर आलीय. रजेचा अर्ज स्वतः टाईप करून नेला.

( उठून उजव्या बाजूच्या विंगेकडे जातो. तो आणि ऑफिसर -- हे नवं पात्र -- टेबल घेऊन येतात. उजव्या बाजूच्या समोरच्या बाकापुढे ठेवतात. बाकावर ऑफिसर ऑफिसरसारखा बसतो. बाकाजवळ लाचारीनं उभा राहून अरुण-- ) मी हा अर्ज आणलाय --

ऑफिसरः पाहू ? ( पाहून ) नो नो नो ! परीक्षेच्या तयारीसाठी अजिबात लीव्ह मिळणार नाही. आणि काय हो, तुमची तयारी नाही तर परीक्षेला कशाला बसताय ? पण तो अर्थात तुमचा वैयक्तिक प्रश्न आहे. पण लीव्ह -- नो !

अरुण : ( चेहरा पडलेला. ) पण --

ऑफिसरः नाही -- नो !

अरुण : बरं, मग नका देऊ.( हेही पडक्या चेहऱ्यानंच. उगीच आपलं काही तरी बोलायचं म्हणून.)

ऑफिसरः आहे मग देतच नाहीय. पण तुम्ही प्रिव्हिलेज लीव्ह मागा. आजारपणासाठी. ती देऊ. नंतर सर्टिफिकेट द्या.

अरुण : बरं, मग मी टाईप करून आणतो तसं.

ऑफिसरः आणा.( अरुण येऊन आपल्या मूळ जागेवर बसतो. ऑफिसर कामात.)

अरुण : ( कंडक्टरला ) च्यायला ! लीव्ह सँक्शन झाली तरी नको वाटतेय आता. प्रत्येक गोष्टीत हे असं का ? सरळ समजुतीनं का काही होत नाही ?

कंडक्टर: तू फार हळवा आहेस. म्हणून हे असं होतं. आणि अजून नवा आहेस नोकरीत !

अरुण : अरे पण -- काही नाही. च्यायला ! हा सगळा विचका थांबवूनच टाकावा एक दिवस !

कंडक्टर: म्हणजे ड्रायव्हरचा खूनबीन करणार की काय तू ?तसं काही करू नकोस रे बाबा -- खरंच. ( विनवणी )

अरुण : नाही. मी कुणावर -- म्हणजे जगावर म्हणा हवं तर -- सूड वगैरे अजिबात घेणार नाही. पण एका परीनं स्वतःवर मात्र घेणार आहे.

कंडक्टर: तू असलं काही परीक्षेच्या भीतीनं तर बोलत नाहीयस ?

अरुण : ( संतापून किंचाळतो ) परीक्षा गेली झन्नममें! ( धुमसत राहतो.)

कंडक्टर: हे बघ, प्लीज, चिडू नकोस. शांत हो.

अरुण : ( सावरून ) तर मी आता तेच होणार आहे. शांत ! मला दोरी हवी आहे.

कंडक्टर: आता इथं म्हणजे --

अरुण : त्या घंटीची दे काढून.

कंडक्टर: वा महाराज ! सबंध बसचाच आयुष्यधागा आहे तो. तो कापून काय करू ?

( अंधार. प्रकाश पडतो तेव्हा ऑफिसरच्या मागं दोनतीन बाकं सोडून त्याच्याच वयाचा एक माणूस बसलेला. पोशाख त्या मानानं कमी धारेचा. आपलं ' ताडे ' हे आडनाव याला सारखं खटकतं. त्यामुळे तो सारखं ते लोकांना सांगतो. कॉन्शस.)

ताडे : ( हातातला कागद फडकावीत ) माझं नाव ताडे आहे -- म्हणजे आडनाव. ते सोडा. पण मला हे असं ल्याह्यचे प्रसंग येतात म्हणून मी लिहितो. मला हौस का आहे ? बघा हं. वाचून दखवतो. हे फक्त आज्ञापत्रक आहे. बघा.( वाचतो.) ' महात्मा फुले मार्केटकडील झाडूवाला दगडू धोंडू तंटे हे १८ डिसेंबर एकोणीसशे अमूकपासून अधिकृत रजेविना, परवानगीशिवाय व आपणहून आजतागायत सतत कामावर गैरहजर राहिले आहेत. याबद्दल त्यांना जावक क्रमांक एच.एस.ओ.८६३ दि.३०-१ अमूक तमूकची रजिस्टर्ड ए.डी.पोस्टाने शो कॉज नोटीस दिली असता त्यांनी मुदतीत कोणताही खुलासा पाठविला नाही. यावरून श्री.दगडू धोंडू तंटे यांनी स्वेच्छेने, महानगरपालिकेची नोकरी सोडल्याने महानगरशासक यांची डेलिगेशन ऑर्डर क्रमांक एम सी - डी सी एल १/४९३ दि १७/८ अमूक अमूक ( एम सी डी - सी एल १/ ४९७ दि १७/८ अमूक अमूकसह ) अन्वये त्यांना दिनांक १९ डिसेंबर अमूक अमूकपासून महानगरपालिकेच्या नोकरीतून मुक्त (डिस्चार्ज ) करण्यात येत आहे. कळावे. आरोग्यप्रमुख -- सही : एम.सी. ताडे.' आता मला माहिती आहे. तो माणूस गरीब होता. लाचार होता. पण मी करणार काय ? मला हे करावंच लागलं. नोकरी आहे. मजबुरी आहे. मला खरोखरच दुःख होतं. यातना होतात. वेदना --

कंडक्टरः हे त्या मागं बसल्या आहेत त्यांचं नाव आहे. वेदना देव. कशी आहे सांगड ?

ताडे : सॉरी,सॉरी. मला त्यांचं नाव नव्हतं घ्यायचं. माहीत नव्हतं मला -- माहीत नव्हतं.

कंडक्टरः नाही तरी त्यांचं लक्ष नाहीच आहे म्हणा !

ताडे : हे कदाचित त्यांचं दुर्दैव म्हणा हवं तर. यात माझा काय दोष ?

कंडक्टर: राइट !

ताडे : अहो, काही काही माणसं इतकी सुदैवी असतात, बरं का, माझ्या माहितीचा एक माणूस आहे -- मित्र म्हणा हवं तर -- तर त्याच्या टेलिफोन नंबरचे पहिले दोन आकडे म्हणजे त्याचा घरनंबर ! आहे की नाही ! -- पण तो नव्हता तसा. शेवटी मला करावंच लागलं ते. करावंच लागलं. माझं नाव ताडे असण्याचा न् याचा काहीही संबंध नाही. खरंच काहीही संबंध नाही.

ऑफिसरः ( मान वळवून ताडेकडं पाहात ) अहो, पण कोण म्हणतंय तसं आहे म्हणून ? कर्तव्य हे केल्याशिवाय होतच नसतं मुळी. त्याला कुणाचा काय इलाज आहे ? अं ? ( मग काहीतरी लक्षात आल्याप्रमाणे ) शिपाई ऽऽ ए शिपाईऽऽ ( शिपाई येतो. आदब.) मी तुला इथली ॲरेंजमेंट बदलायला सांगितली होती.

शिपाई : होय साहेब. आत्ता करतो.

ऑफिसरः अरे हो, पण आधी का नाही केलंस ? असा कर्तव्यचुकारपणा का ?

शिपाई : नाही साहेब.( टेबल उचलून घेऊन जातो.)

ऑफिसरः तर बोला मंडळी. माझं नाव गोपाळराव जोशी.

कंडक्टर: तर लोकहो, एकाएकी बसमधे घुसाचयी या माणसाची तरकीब पाहिलीत ना ? पण सॉरी. आता हा ऑफिसर नसून गोपाळराव जोशी आहे. आणि हा ऑफिसर असेल असं काही नाही. आणि असला तर तोच असेल असं तर मुळीच नाही. राइट ? ॲक्शनमधे अडथळा आणल्याबद्दल माफ करा. राइट ?

गोपाळरावः नाही, म्हणजे तुम्ही म्हणता ते अगदी बरोबर आहे. एखाद्या व्यक्तीच्या क्षणिक स्वार्थासाठी सगळ्यांचा बळी देणं, हे केव्हाही वाईटच. दोरी तोडू नका. अशा कृत्याला आपण कधीही संमती देता कामा नये. त्याचा निषेध केला पहिजे.

ताडे : हे मलाही मान्य आहे. मलाही मान्य आहे. पण माणसाची दुःखं, माणसाचे प्रश्न, माणसाच्या समस्या, माणसावरची दडपणं, माण--

कंडक्टरः समजा ! तर या सगळ्यांचं काय म्हणायचंय तुम्हाला ? प्लीज बी क्विक !

ताडे : तर या सगळ्या गोष्टी असतातच. असतात की नाही ? मग त्याला दुसऱ्या माणसांनी सहानुभूती दाखवली पाहिजे. माणसानं माणसाच्या दुःखात सहभागी झालं पाहिजे. तरच आपले या पृथ्वीवरचे चार दिवस आपल्याला गुण्यागोविंदानं घालवता येतील. लव्ह दाय नेबर. अरे कुणाची मदत नाही,सदिच्छा नाही,सहानुभूती नाही -- असं एकटं लाईफ जगणं शक्य आहे का ? म्हणून समाजाचं अस्तित्व आपण मान्यच केलं पाहिजे. मान्यच केलं पाहिजे.

गोपाळरावः मान्य ! मग आता आपण काय करावं असं तुमचं म्हणणं आहे ? हा माणूस फास लावून घेईल आणि मरून जाईल -- पण तोपर्यंत सबंध बसचं आयुष्य खुंटेल त्याचं काय ? समाज हा एकदा गृहीत धरला की व्यक्तीचा क्षणिक -- आता हा क्षणिक म्हणजे कायमचाच आहे -- तर अशा स्वार्थासाठी --

ताडे : खरंच ही एक कठीण अशी समस्या आहे. पण या बाबतीत मी असं म्हणेन की, थोडा वेळ आपण याला या दोरीचा उपयोग करू देऊ आणि त्याचं काम झालं की -- म्हणजे माझं नाव ताडे हे खरंच पण --म्हणजे लव्ह दाय नेबर, हे आपण पाहिल्यांदा पाह्यला हवं. व्यक्तीसाठी थोडासा क्षणिक त्याग करावा लागला तरी समाजानं तो करावा, करावा तो समाजानं.

कंडक्टर: ही दोरी द्यायला मी तयार नाही.

अरुण : पण --

कंडक्टर: नो.

अरुण : तुला माझी दया येत नाही ? तुला --( कंडक्टर निर्विकार. इकडं तिकडं पाहातो. मागच्या उतारूकडं लक्ष जातं. उतारू आणि वेदना यांचा एकेक हात समोरच्या बारवर आहे आणि उतारूचा हात हळूहळू तिच्या हाताकडे सरकतोय -- हे अर्थात इतरांची नजर चुकवत चाललंय. लक्ष जाताच उतारू पटकन हात बाजूला करतो.) -- अहो, तुम्ही तरी सांगा ना --

उतारू : अं ? हं हं. हे बघा, मरण, आत्महत्या वगैरे विषयात आपल्याला इंटरेस्ट नाही -- अर्थात आपल्याला म्हणजे मला. म्हणजे मला आपलं असं वाटतं की -- बस ! जगावं झालं ! काय आहे त्याच्यात-- एवढं लाईफ असतं !( हात पुन्हा बारवर. हे वेदनेशेजारच्या बाईचं लक्ष तर नाही हे पाहून. वेदनाचा हात

तसाच. नुसतं किंचित तटस्थ स्मित.)

अरुण : कंडक्टरसाहेब --

कंडक्टर: काही मला साहेबबिहेब म्हणू नको. आपण चांगले दोस्त आहोत. हा तुझा स्वार्थ आहे की नाही ? समाज वगैरेबद्दल मी काही मत देत नाही -- पण हा तुझा विचारच क्षणिक आहे, असं माझं मत आहे आणि अशा क्षणिक विचारासाठी माणसानं आपलं आयुष्यच्या आयुष्य नष्ट करावं, हे मला मान्य नाही.( उतारूचा हात सरकतोच आहे. चेहरा जणू तो बोलण्यात भाग घेतोय असा, पण इकडं हात जणू त्याचा नसल्यासारखा सरकतोय.)

अरुण : नाही रे -- खरंच नाही. माझा अगदी पक्का निर्णय झालाय आणि हा काही नुसता तात्पुरता विचार नाही. गेल्या सर्व वर्षांचं माझं आयुष्य -- त्यातून हे ठरलंय. आणि हे अगदी साफ - म्हणजे संपूर्णपणे -- अगदी खरं आहे. खरं खरं आहे.

गोपाळराव: मंडळी, मला असं वाटतं बरं का --

अरुण : हा माझ्या जीवनमरणाचा प्रश्न आहे आणि तुम्ही सगळे नुसता वाद घातलाय. शिवाय प्रत्येकाचं म्हणणं बरोबर आहे. हा नुसता विलंब होतोय. वेळ जातोय नुसता.

ताडे : अहो, आता तुम्ही सबंध वेळच्या वेळच नष्ट करायचं ठरवलेलं आहे, तर हे एवढ्याशा वेळाचं काय घेऊन बसलात ? तुमच्या मागणीला मी माझा नैतिक पाठिंबा व्यक्त करतो. काहीही झालं तरी माणसानं माणसाला दुःखातून बाहेर पडायला मदत केलीच पाहिजे. केलीच पाहिजे मदत.

गोपाळराव: तर मंडळी, मी एक मार्ग सुचवतो ( इकडंतिकडं बघतात.)

उतारू : ( हात स्थिर ) हो, सुचवा, सुचवा. छान ! कुठल्याही प्रश्नावर चर्चा करण्यापेक्षा काहीतरी मार्ग सुचवणं हे काहीतरी विधायक आहे. सुचवा तुम्ही. थेट अगदी मार्गच सुचवून टाका.

कंटक्टर: काय म्हणणं आहे तुमचं ?

गोपाळराव: मला वाटतं, आपण यावर मतं घेऊ या. ज्या बाजूला जास्त मतं असतील तसं करायचं !

कंटक्टर: ह्यँ ! हे आपल्याला मंजूर नाही.

अरुण : ( वैताग -- लाचारी ) अरे पण काही तरी ठरवा नं मग !

गोपाळराव: कंटक्टरसाहेब, मी या सूचनेत थोडा बदल सुचवतो. मग पटते का पाहा.

ताडे : ( जणू वाद करण्यासाठीच ) बोला.

गोपाळराव: दोन्ही बाजूंच्या पुरस्कर्त्यांना आपण मतप्रचारासाठी थोडा वेळ देऊ. म्हणजे उदाहरणार्थ हे श्री. ताडे होकारार्थी प्रचार करतील. तुम्ही नकारार्थी करा.

कंडक्टर: नामंजूर !

अरुण : का पण ?

उतारू : ( हात पटकन उचलून घेत -- तोच संमतिदर्शक उंचावत ) मान्य ! एकदम कबूल ! पण काहीतरी करा एकदा.

ताडे : ही गोष्ट मला मान्य नाही. यात आपली मतं इतरांना पटवून देण्याच्या कौशल्याला प्राधान्य मिळतं. खरं म्हणजे खरं की खोटं, योग्य की अयोग्य याला प्राधान्य मिळालं पाहिजे.

गोपाळराव: महाराज, म्हणजे काय करायला हवं असं आपलं म्हणणं आहे ?

ताडे : ते काही असो -- आम्हा दोघांनाही हे मंजूर नाही तेव्हा --

कंडक्टर: तुम्हाला मंजूर असतं तरी मी याला संमती दिली नसती.

अरुण : पण का ?

कंडक्टर: नो ! इथं मी म्हटलं तरच अन् तीच दिशा. नाही तर नो दिशा !

गोपाळराव: बरं मंडळी, हे सोडा. दुसरं सुचवतो. एकदम साधा, सोपा मार्ग.

उतारू : अहो सुचवा नं मग -- अजून सुचवलाच नाहीत का ? काय उगीच मघापासून ! हॅ !

गोपाळराव: सरळ नाणेफेक करा ! चीतपट ! कुणीतरी जिंकेल -- कुणीतरी हरेल. निकाली सामना !

कंटक्टर: नामंजूर !

अरुण : का ?

गोपाळराव: अहो, मग तुम्ही सुचवा एखादी तोड. काय आमचीच स्वीकारली पाहिजे असं नाही !

कंडक्टर: मला यातलं काहीही मान्य नाही. मी तोडबीड सुचवणार नाही. कुठल्याही परिस्थितीत मी या दोरीला

इथून हलवू देणार नाही.

गोपाळरावः बरं, आपण त्या बाईंना विचारू. त्या मघापासून गप्प आहेत. काय हो बाई, तुम्हाला काय वाटतं ?( प्रौढा काही बोलतच नाही. तश्शी बसून.) अहो बाई --अहो -- शुक् शुक् ! च् ! ( टाळ्या वाजवतात. ) अहो ! त्या  बोलतच नाहीत. ठीक आहे. पण एकदा हे म्हणजे --

ताडे : माणसानं माणसासाठी जगलं पाहिजे आणि माणसानं माणसासाठी मेलं पाहिजे, असं माझं स्पष्ट मत आहे -- आणि हे एक त्रिकालाबाधित सत्य आहे. ते कधीही बदलणार नाही.

गोपाळरावः अहो पण हे सद्‌गृहस्थ स्वतःसाठी मरणार आहेत -- माणसासाठी नव्हे !

अरुण : प्लीज -- ( हे आपण नक्की कुणाला म्हणतोय हे त्यालाही माहीत नाही.) निर्णय करा नं एकदा -- प्लीज-- (हे कंडक्टरला. )

कंडक्टर : मी कुठलाही निर्णय होऊ देणार नाही.

गोपाळरावः घ्या ! मग हे जर आधी माहीत असतं तर एवढा वेळ कशाला झक मारीत बसलो असतो !

ताडे : माझ्या नावामुळं माझी मतं अशी आहेत, असं समजू नका. ती खरी आहेत म्हणून माझी आहेत. एरवी ती माझी नसती. एखाद्याला मरू देणं यात नुसता अमानुषपणा दिसतो तुम्हाला. माणुसकी दिसत नाही.

कंडक्टर : हा ज्याच्या त्याच्या वृत्तीचा प्रश्न आहे.

तरुण : ( किंचाळतो ) का SSSSS ? हा जुलूम आहे. ही जबरदस्ती आहे. हा अत्याचार आहे. हे मला सहन होणार नाही. मी ते सहन करणार नाही. का असं तुम्ही सगळ्यांनी वैर धरलंय माझ्याशी ? मी काय तुमच्या बापाचं घोडं मारलं होतं ? हा अन्याय आहे. सत्तेचा --

कंडक्टरः ते काहीही असलं तरी ते तसंच ! पण आपण दोस्त आहोत, ही परिस्थिती मात्रं खरी आहे आणि मुख्य म्हणजे ती मला मान्य आहे.

अरुण : पण काSS?

कंउक्टर : हा ज्याच्या त्याच्या वृत्तीचा प्रश्न आहे. हा ज्या च्या त्या च्या वृ त्ती चा प्र श्न आ हे ! राइट ?

( इथे एकदम अंधार होतो. या सबंध चर्चेत वेदना देवला सामील करून घेतलं जात नाही, याचं कारण, तिचं मुसमुसतं तारुण्य आणि जहाल आकर्षकपणा यांची भीती -- हे जाणवावं -- निरनिराळ्या कृतींतून. पुन्हा हळूहळू प्रकाश पडतो तेव्हा झाडूवाला दगडू धोंडू तंटे उदास, गळाठवाणी पावलं टाकीत येऊन एका बाकावर बसतो. दाढी वाढलेली. जुनाट, मळके कपडे. मागोमाग सौ.उतारू येतात. वय तीसपर्यंत. मधे थोडं अंतर ठेवून तंटे बसलेल्याच बाकावर बसतात. अरुणच्या डोक्यात गोंधळ माजलेला असून कुठलेतरी मार्ग कुठंतरी जातायत. उतारूनं वेदनेचा हात आपल्या हातात घेतलेला आहे.( तिच्या चेहऱ्यावर मीलनवेदना.)

अरुण : मै चल रहा हूं ! तुम चल रहे हो ! वे चल रहे हैं ! वे चल रही हैं ! आप चल रहे हैं ! आप चल रही हैं ! (हिंदी व्याकरण पाठ करत असल्यासारखा ) हैं-हैं-हैं ! हैं-हैं-हैं !हैं-हैं-हैं ! ( जणू अनुनासिकं पाठ करतोय.)

कंटक्टर : ( त्याच्याहून जोरात ) ऐ SSSS ।

( अरुण गप्प. दचकून तंटे आणि सौ. उतारू सोडून बाकीचे चमकून पाहतात.) बंद !

गोपाळरावः आता कशाला चिडताय उगीच कंडक्टरसाहेब !

ताडे : मानव या नात्यानं खरोखर हा आपणा सर्वांचा निर्घृणपणा झालेला आहे. त्यापेक्षा त्याला मरू दिलं असतं तर ! हा त्याचा आपण जिवंत खून केलेला आहे ! आपण --

गोपाळरावः आता कशाला उगीच जुनी मढी उकरून काढताय ? किंवा शिळ्या कढीला ऊत आणताय ? वादानं, चर्चेनं काही होत नाही, हे कळलंय की नाही आपल्याला !

ताडे : पण --

गोपाळरावः अरे ! पुन्हा ' पण ' ! मंडळी, आता आपण जरा निर्विवाद विषयावर बोललो तर मला वाटतं बरं होईल -- अं ! आज बावीस तारीख आहे.

अरुण : ( हर्षानं ओरडत सुटतो ) आज बावीस तारीख आहे. आज बावीस तारीख आहे. आज बावीस तारीख आहे. आज --

कंडक्टर : ऐ SSSS । बंद ! ( अरुण गप्प.) ही शांतता अशीच राहिली पाहिजे ! शांतताभंग होतो याचा अर्थ काय ! अं ! ( तंटे आणि सौ. उतारू या सगळ्या गोष्टींपासून लांब असल्यासारखे. या सगळ्यांशी त्यांचा संपर्क

नाही. ते दूर कुठेतरी आहेत. वेदनेजवळची प्रौढा मूक. लक्ष आहे -- चमकणं वगैरे इतरांबरोबर. पण शक्य तो तटस्थ -- स्वस्थ.) शांतता टिकून राहिली पाहिजे ! ( तंटे -- सौ.उतारू बसलेल्या बाकापुरता स्पॉट. बाकी अंधार. कंडक्टर त्यांच्याजवळ येऊन टिक टिक करतो.) तिकीट !

तंटे : ( अत्यंत लाचार, केविलवाणा. हात जोडत ) नाही साहेब -- खरंच. माझी नोकरी गेलीय साहेब, दया करा.

कंडक्टर : तू आत आलासच कसा ? अं ? चलो, चलो --

तंटे : नाही साहेब. खरंच.

कंडक्टरः दयाबिया मी जाणत नाही. तू आधी --

सौ.उतारूः हे बघा, मी काढते त्याचं तिकीट.

तंटे : देव तुमचं भलं करील बाई -- भलं करील !

( सौ.उतारु त्याला कितीचं काढायचं ते विचारते. तो सांगतो. तिलाही तेवढंच हवं असतं. दोन बोटांच्या खुणा करते. सांगते. कंडक्टर तिकिटं देतो. नुसत्या हालचाली. नंतर कंडक्टर स्पॉटबाहेर जातो.)

सौ.उतारूः ( थोड्या वेळानं ) फार दुःखी दिसताय तुम्ही --

तंटे : होय बाई. खरं आहे. बायको आजारी होती माझी खूप दिवस. गेली. दोन पोरं आहेत अन् नोकरी गेली. आकाशाची कुऱ्हाडच ! बाई, आकाश कोसळलंय !

सौ.उतारूः खरंच -- कळतंय मला -- काय झालं असेल -- खरंच दुःख फार वाईट बघा -- फार वाईट !

( तंटे नुसता उसासा टाकतो.) मीसुध्दा तेच अनुभवते आहे ! तेच !

तंटे : हूं ऽ !( बघतो.)

सौ.उतारूः कुणाला तरी सांगावं वाटतंय म्हणून तुम्हाला सांगते. माझे यजमान दूर जातायत माझ्यापासून --

तंटे : कुठं ?

सौ.उतारूः दूर म्हणजे परगावी किंवा परदेशी नव्हे -- दूर ! हो -- त्या अर्थानं दूर म्हणतेय मी ! त्या अर्थानं !

तंटे : आस्सं ! वैट ! वैट ! फार वैट ! पण कोण आहे ती दुसरी बाई ?

सौ.उतारूः कुणीही. अमूकच असं नाही -- कुणीही !

तंटे : मला पण काय करावं असा घोर प्रश्न पडलाय -- पदरात दोन पोरं !

सौ.उतारूः लग्न होऊन पाच वर्षं झाली अन् कंटाळले मला एवढ्यात ! मूल नाही आम्हाला -- नाहीय म्हणजे मी अजून-- पण आता म्हणजे --

तंटे : मला नोकरी बघायला हवी लवकर -- लवकर मिळायला हवी कुठंतरी दुसरी -- खरंच -- नाहीतर --

सौ.उतारूः हंऽ ! सगळे प्रयत्न फोल ठरले माझे. उलट, त्यामुळं अंतर वाढतच जातंय आमच्यातलं.

तंटे : हं ऽऽऽऽ । काय करणार बाई ! आहे या परिस्थितीला तोंड द्यायला हवं ! द्यायलाच हवं ! दुसरं काय करणार -- काय करणार दुसरं !

सौ.उतारूः तू तुझ्या दुःखातून लवकरात लवकर मुक्त व्हावास, असं वाटतं बघ मला.

तंटे : तुम्ही पण. दिलजमाई हूंद्या तुमची.

सौ.उतारूः मला तुझ्याबद्दल फार काही वाटतंय बघ ! फार !

तंटे : बाई ! ( एकेरीवर येणं त्याला जाणवलेलं आहे.)

सौ.उतारूः खरंच ! घटस्फोट घेईन मी -- खरंच --( तंटे चकित.) घटस्फोट घेईन.( त्याचा हात हातात घेते.) घटस्फोट घेईन !

तंटे : किती चांगली आहेस तू ! एकमेकांच्या दुःखात साथ हवीच. पण मी हा असा -- तुला --

सौ.उतारूः चालेल. तुला नोकरी लागेल. मला नोकरी आहे. तुझी पोरं मी सांभाळीन. आपण सुखानं संसार करू. सुखात आयुष्य घालवू.

तंटे : मी तुला कधी पण अंतर देणार नाही -- फक्त माझा दर्जा जरा -- एवढंच -- बाकी सगळं मी तुझ्या नवऱ्यासारखाच राहीन -- म्हणजे तसं नव्हे -- पण माझा दर्जा --

सौ.उतारूः कसला दर्जा ? इतर जसे जन्माला येतात तसा तूही आलायस. इतर जगतात. तूही जगतोयस. इतरांना जसं शरीर असतं तसं तुलाही आहे.

तंटेः : हं ! आहे ! खरंच ! दर्जाबिर्जा सब झूट है ! आपण आपली एकमेकांची दुःखं नाहीशी करू ! सुखात राहू ! सुखात !!( आता दोघंही अगदी लगटून बसलेयत.)

कंटक्टरः ऐ ssss ( प्रकाश तसतसा पसरत जातो.) बंद !( अरुण नुकताच गप्प झाल्यासारखा उभा. उतारू आणि वेदना अगदी लगटून कुजबुजत - हसत. प्रौढा लक्ष ठेवून पण तटस्थ. )शांतता भंग पावलेली मला अजिबात चालणार नाही. पुन्हा एकदा सांगून ठेवतोय, हे मला अजिबात चालणार नाही.

ताडे : खरंच -- मला करावंच लागलं म्हणून केलं ते -- मला माहीत होतं --तो लाचार होता -- गरीब होता -- पण करावंच लागलं ते मला -- करावंच लागलं. माझ्या नावाचा न् त्याचा काही संबंध नाही -- खरंच -- काही संबंध नाही -- काही --

गोपाळरावः जाऊ द्या हो. बोला मंडळी !( कंडक्टर पुढे पुढे येतो तसतसा प्रकाश फिकट होत जातो. उतारू आणि वेदना तसंच सौ.उतारू आणि तंटे एकमेकांना लगटून कुजबुजताहेत -- बाकी सगळे निश्चल -- फिकट प्रकाशात पुढं असलेल्या कंडक्टरवर स्पॉट. )

कंडक्टर : तर लोकहो, अशी ही एक बस. अनेक काळ -- अनेक ठिकाणं...अनेक दिशा. संबंध किंवा असंबंध -- की असंबध्द वगैरे वगैरे. ऐन वेळी -- आयत्या वेळी म्हणा हवं तर -- हा ज्याच्या त्याच्या वृत्तीचा प्रश्न आहे-- राइट ? तर ऐन वेळी जे जसं उपलब्ध झालं ते तसं तुम्हांला दाखवलं. तुम्ही अर्थात ते बघितलंत असं गृहीत धरतो. तर ही एक एकमेव अशी बस -- ही बाकं -- ही काही माणसं -- हा मी ऊर्फ कंडक्टर आणि ते तुम्ही. ड्रायव्हर मधे कुठंतरी आहे खास ! आहेच ! ( आठवल्यासारखं ) अरे हो, आपला तो एक पुरातन प्रश्न राहिलाच की ! ही बस सुरू होणं -- थांबणं वगैरेचा अर्थ. खरं सांगायचं तर ते अजूनही मला कळलेलं नाही. आणि मी त्याची फारशी चिंता करत नाही. कारण, कुठल्याही गोष्टीची सुरुवात वा शेवट यांच्या अर्थापेक्षा मधल्या भागाला काही अर्थ आहे काय, ते पाहणं खरं महत्त्वाचं आहे. आता हे एक माझं मत आहे, असं म्हणण्याचं स्वातंत्र्य अर्थातच तुम्हांला आहे. असो. बरं, लोकहो, एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट तुमच्या लक्षात आलीय का ? सांगतो. या बसचं तोंड सुरुवातीपासूनच तुमच्या दिशेला आहे. आता एक खरं की, अंतरात स्थिर असल्यामुळं ती सरळ तुमच्यावरून, तुमच्या रक्तामांसाचा चिखल करून जाऊ शकलेली नाही. पण काळात ती तुमच्यावरून गेलेली आहे. आणि महाराज-- महाराणी, तुम्हाला एक गंभीर अपघात झालेला आहे, होय एक अतिशय गंभीर अपघात झालेला आहे. एक फार गंभीर अपघात झालेला आहे.( पडदा पडू लागतो.) अहो पडदेवाले, प्लीज, वन मिनिट -- तुम्हाला एक गंभीर अपघात झालेला आहे -- पडदेवाले -- तुम्हाला एक गंभीर अपघात झालेला आहे -- पडदेवाले तुम्हाला एक --
( अर्थात पडदा पडतोच.)

...पडदा पडत जातो...



पत्ता -चं.प्र.देशपांडे,
३, स्नेहदीप अपा.
चिंतामणीनगर,
सहकारनगर नं.२, पर्वती,
पुणे - ४११ ००९.

**दूरध्वनी - ४२२ ७८४७.**